**सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत अनुसूचित जमातीचा जातीदावा अवैध ठरलेल्या अधिका-यास सेवेत पुर्नस्थापित करण्यासाठी कार्यकारी अभियंता संवर्गाचे एक अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२०/प्र.क्र.४७/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. ०९ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण -११२०/ प्र.क्र.११/सेवा-१, दि.०३ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना -:**

माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरूध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि. ०६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने माननीय उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दि. २८ सप्टेंबर, २०१८ च्या आदेशान्वये सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि. ३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुषंगाने उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेता, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले अधिकारी / कर्मचारी, अनुसूचित जमातीचा दावा सोडून दिलेले अधिकारी / कर्मचारी तसेच ज्या अधिकारी व कर्मचा-यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात माननीय न्यायालयात याचिका दाखल केल्या असतील, मात्र त्यांच्या प्रकरणी माननीय उच्च न्यायालयाने किंवा माननीय सर्वोच्च न्यायालयाने जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या समितीच्या

निर्णयास स्थगिती दिली नसेल असे अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या असल्याने, त्यासाठीचे अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ व २ या शासन निर्णयांमधील तरतुदींच्या अधीन राहून, सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रपत्र 'अ' मध्ये नमूद अधिका-याच्या सेवा अधिसंख्य पदांवर वर्ग करण्यात आल्याने त्यासाठी आवश्यक कार्यकारी अभियंता यांचे अधिसंख्य पद निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर अधिसंख्य पद तात्पुरत्या स्वरूपात अकरा महिन्यांकरिता किंवा सदर अधिकारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीपर्यंत निर्माण करण्यात येत आहे.

२. या अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित अधिकारी / कर्मचारी ज्या कार्यालयात कार्यरत राहतील, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९०९१६२९४४९११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nisha Manohar Mahajan

Digitally signed by Nisha Manohar Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a9f1749dec86c69520dc99c8a73d64e830153ee031b1b93c743e21a94cd3e93, cn=Nisha Manohar Mahajan
Date: 2020.09.10 12:08:44 +05'30'

**( नि. म. महाजन )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत**-१. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.

४. सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
९. सर्व सह सचिव / उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१३. कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग.
१४. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती).

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२०/प्र.क्र.४७/प्रशासन-१
दि. ०९ सप्टेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.

**प्रपत्र अ**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गतच्या अधिकारी / कर्मचारी यांचे अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याच्या कारणास्तव निर्माण करावयाचे अधिसंख्य पद

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचा-याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवा समाप्त करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. माधव यादवराव शंखपाळे | कार्यकारी अभियंता गट-अ | ०३.०१.१९९० | ११.०१.२०१८ | ०३.०९.२०२० | रू. १,४१,३२५ (मूळ वेतन- रू.१,१२,१००+ महागाई भत्ता- रू.१९,०५७+ वाहन भत्ता - रू.१,२००+ घरभाडे भत्ता - रू.८,९६८ = रू.१,४१,३२५) |